जी.टी.हॉस्पिटल कॉम्प्लेक्स इमारत, ८ वा मजला येथे महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई या कार्यालयास जागा वाटप करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११४/प्र.क्र.२१/२०१४/२२

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: २६ मार्च,२०१५

**वाचा :**

शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११४/प्र.क्र.२१/२०१४/२२, दि.२४-२-२०१५

**प्रस्तावना :**

शासन निर्णय क्र.शाकाजा-१११३/प्र.क्र.२४/२०१३/२२, दि.१४-३-२०१३ मधील परिच्छेद-२ नुसार जी. टी. हॉस्पिटल कॉम्प्लेक्स इमारत, ६ वा मजला येथे महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई या कार्यालयास १००० चौ.फू. जागेचे वाटप करण्यात आले होते. मा.उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्र.५७/२०१२ मध्ये दि.२८-१-२०१५ रोजी दिलेल्या निर्णयानुसार जी.टी.रुग्णालय संकुल इमारतीतील ४, ५ व ६ मजला येथील प्रशासकीय विभागांना स्थलांतरीत करुन सदरची जागा मा.उच्च न्यायालयाच्या प्रशासनास देण्याबाबतचे आदेश आहेत. त्यानुसार संदर्भीय शासन निर्णयांन्वये जी. टी. हॉस्पिटल कॉम्प्लेक्स इमारत, ८ वा मजला येथील तत्कालीन राज्यमंत्री (कृषि, पशुसंवर्धन इ.) यांच्या सभागृहासाठी वाटप करण्यात आलेली १००० चौ.फू. जागेचे वाटप महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई या कार्यालयास करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.आता या निर्णयामध्ये अंशत: बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता त्यानुषंगाने आता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

## शासन निर्णय:

शासन निर्णय क्र. शाकाजा-१११४/प्र.क्र.२१/२०१४/२२, दि.२४-२-२०१५ अन्वये जी. टी. हॉस्पिटल कॉम्प्लेक्स इमारत, ८ वा मजला येथील तत्कालीन राज्यमंत्री (कृषि, पशुसंवर्धन इ.) यांच्या सभागृहासाठी वाटप करण्यात आलेली १००० चौ.फू. जागेचे वाटप महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई या कार्यालयास करण्याचा निर्णय घेण्यात आला होता त्यात अंशत: बदल करुन आता शासनाने जी. टी. हॉस्पिटल कॉम्प्लेक्स इमारत, ८ वा मजला येथील तत्कालीन राज्यमंत्री (कृषि, पशुसंवर्धन इ.) यांच्या कार्यालयासाठी वाटप करण्यात आलेली १०८० चौ.फू. जागेचे वाटप महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई या कार्यालयास करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय क्र.शाकाजा-१११३/प्र.क्र.२४/२०१३/२२, दि.१४-३-२०१३ मधील अन्य जागा वाटपांचे आदेश पूर्वीप्रमाणेच कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१४५३०४८००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Harishchandra Bhagat

Digitally signed by Pramod Harishchandra Bhagat
DN: CN = Pramod Harishchandra Bhagat, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.03.30 15:03:21 +05'30'

( प्र. ह. भगत )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
८. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. महाराष्ट्र सुदूर उपयोजन केंद्र, मुंबई यांचे कार्यालय, जि. टी. रुग्णालय संकुल इमारत, ६ वा मजला , मुंबई-०१.
१२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.
१३. शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जि. टी. रुग्णालय संकुल इमारत, मुंबई-०१.
१४. मुख्य दुरध्वनी चालिका मंत्रालय, मुख्य इमारत तळमजला, मुंबई-३२.
१५. निवडनस्ती.